श्री. संतोष वाहुळे यांना छत्रपती संभाजीनगर महानगरपालिकेतील मुख्य लेखा व वित्त अधिकारी या पदावर दोन वर्षांसाठी मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : छसंम-२०२३/प्र.क्र.२३५/नवि-२४**

मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १९ जुलै, २०२४.

**वाचा :-** १) संलेको-२०२१/प्र.क्र.१४०/कोषा. प्रशा.२, दि.०६/१०/२०२१.
२) संलेको-२०२३/प्र.क्र. ०९/कोषा. प्रशा.२, दि.२९/०३/२०२३
३) शासन आदेश क्र. संलेको-२०२३/प्र.क्र.२२०/कोषा. प्रशा.२, दि.१६/१०/२०२३.
४) आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका दिनांक ३०/०५/२०२४ रोजी चे पत्र

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, उपसंचालक संवर्गातील अधिकारी श्री. संतोष वाहुळे यांना संदर्भ क्र.१ येथील वित्त विभागाच्या दिनांक ०६.१०.२०२१ रोजीच्या आदेशान्वये मुख्य लेखा अधिकारी, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका या पदावर पदस्थापना देण्यात आली. तद्नंतर संदर्भ क्र.२ येथील वित्त विभागाच्या दिनांक २९.०३.२०२३ रोजीच्या आदेशान्वये श्री. संतोष वाहुळे यांना महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, सहसंचालक संवर्गात पदोन्नती देण्यात येवून त्यांना मुख्य लेखा व वित्त अधिकारी, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका या पदावर प्रपत्र बढती देण्यात आली. त्याचप्रमाणे संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या दिनांक १६.१०.२०२३ रोजीच्या आदेशान्वये श्री. संतोष वाहुळे यांच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका या पदावर प्रपत्र बढतीस दिनांक २८.०९.२०२३ पासून दिनांक २७.०९.२०२४ या एक वर्षाच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती.

२. श्री. संतोष वाहुळे यांच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका या पदावर करण्यात आलेल्या पदस्थापनेची मुदत दिनांक २७.०९.२०२४ रोजी संपत असून श्री. संतोष वाहुळे यांना मुख्य लेखा व वित्त अधिकारी, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका या पदावर दिनांक २८.०९.२०२४ पासून पुढील २ वर्षे मुदतवाढ देणेबाबत आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन क्र ४ च्या पत्रान्वये पत्रान्वये ना-हरकत कळविलेली आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, उप संचालक संवर्गातील श्री. संतोष बालाजी वाहुळे यांची संदर्भाधीन क्र.१ येथील आदेशान्वये मुख्य लेखा व वित्त अधिकारी, महानगरपालिका छत्रपती संभाजी नगर येथे बदलीने पदस्थापना करण्यात आली आहे. दरम्यान, संदर्भाधिन क्र.२ च्या शासन आदेशान्वये श्री. संतोष बालाजी वाहूळे

यांचो महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, सहसंचालक संवर्गात पदोन्नतीने मुख्य लेखा व वित्त अधिकारी, महानगरपालिका छत्रपती संभाजीनगर येथे प्रपत्र बढती देण्यात आली आहे. त्यांच्या सदर पदावर करण्यात आलेल्या नियुक्तीचा कालावधी दिनांक २७.०९.२०२४ रोजी संपुष्टात येणार आहे.

२. श्री. संतोष बालाजी वाहुळे, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, सहसंचालक संवर्ग यांच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी, महानगरपालिका, छत्रपती संभाजीनगर या पदावरील नियुक्तीस या आदेशान्वये दि.२८/०९/२०२४ पासून पुढे दोन वर्षांची म्हणजेच दि. २७/०९/२०२६ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०७१९१२१२३०९१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAYANT VASANT WANI

Digitally signed by JAYANT VASANT WANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed8411d02826988b56bb8a80c92781268bc4b9d63f894022804b55bd1cea9847, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BFF25E350EA9446CC7F3B43987F8FFE247E43E10915A7723E889FCC11E2F43EB, cn=JAYANT VASANT WANI
Date: 2024.07.19 12:24:17 +05'30'

**( जयंत वाणी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका, छत्रपती संभाजीनगर.
३) नगर सचिव, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका, छत्रपती संभाजीनगर.
४) मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
५) उप सचिव (नवि-२४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
६) निवड नस्ती (नवि-२४).